**स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**
**उरण इस्लामपूर नगरपरिषद, जिल्हा सांगली.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-स्वमअ-२०२०/प्र.क्र.२७(१)/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक ३० जानेवारी, २०२०

**वाचा:-**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र:स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४, दि. १५.०५.२०१५
२. स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत गठीत उच्चाधिकार समितीच्या दि ३०/०८/२०१९ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
३. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र:-स्वमअ-२०१७/प्र.क्र.१०४/नवि-३४, दि.१०.११.२०१७

**शासन निर्णय :-**

स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत उरण इस्लामपूर नगर परिषदेच्या नागरी घनकचरा व्यवस्थापनाच्या रु. ७.७०७९ कोटी रुपयांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास संदर्भीय क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर सविस्तर प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी उरण इस्लामपूर नगरपरिषदे मार्फत सुरु असताना त्यांच्या असे लक्षात आले की, शहरातील घनकचरा व्यवस्थापनाच्या दृष्टिने या सविस्तर प्रकल्प अहवालात काही बाबींचा समावेश नाही. त्यामुळे, त्या बाबींचा समावेश सविस्तर प्रकल्प अहवालात करण्याबाबतचा प्रस्ताव उरण इस्लामपूर नगरपरिषदेने सादर केला होता.

३. इस्लामपूर नगरपरिषदेने सादर केलेल्या प्रस्तावाची तपासणी राज्य अभियान संचालनालयाच्या स्तरावर करून तो प्रस्ताव दिनांक ३०.०८.२०१९ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या मान्यतेसाठी सादर केला होता. उच्चाधिकार समितीने त्याच बैठकीत सदर प्रस्तावास मान्यता दिली आहे.

४. इस्लामपूर नगरपरिषदेने सादर कलेल्या प्रस्तावास उच्चाधिकार समितीने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने या शासन निर्णया सोबतच्या विवरणपत्रातील रकाना ४ मध्ये दर्शविलेल्या व रकाना ५ मधील रू १,१०,००,०००/- ( एक कोटी दहा लक्ष फक्त) किंमतीच्या बाबी मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

५. सदर वाढीव खर्च रक्कम उरण इस्लामपूर नगरपरिषदेने १४ व्या वित्त आयोगाच्या निधीमधून अथवा स्वनिधी मधून करवा. यासाठी शासन कोणताही वाढीव निधी संबंधित नगरपरिषदेस शासन उपलब्ध करून देणार नाही.

६. संदर्भीय क्रमांक ३ येथील दिनांक १०.११.२०१७ च्या शासन निर्णयात नमूद अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

७. सदरच्या बदलामुळे उरण इस्लामपूर नगरपरिषदेच्या सविस्तर प्रकल्प अहवालाची सुधारित किंमत रू ८,८०,७९,०००/- एवढी राहील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३०१७३१३५२७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2020.01.31 18:03:32 +05'30'

**(अजित पालवे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. आयुक्त तथा संचालक, महानगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
९. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
११. जिल्हाधिकारी, सांगली.
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, सांगली.
१३. मुख्याधिकारी, उरण इस्लामपूर नगर परिषद.
१४. निवडनस्ती, नवि-३४.

## विवरणपत्र

(शासन निर्णय क्रमांक:-स्वमअ-२०२०/प्र.क्र. २७(१)//नवि-३४ दिनांक: ३० जानेवारी, २०२० सोबतचे विवरणपत्र)

(रुपये कोटीत)

| शहर | घनकचरा व्यवस्थापनासाठी अनुज्ञेय रक्कम | सविस्तर प्रकल्प अहवालाची मंजूर किंमत | नव्याने मंजूर बाबी | नव्याने मंजूर करण्यात आलेल्या बाबींची किंमत | सविस्तर प्रकल्प अहवालाची सुधारित किंमत |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| उरण इस्लामपूर | ८.०९०० | ७.७०७९ | स्थापस्थ कामाच्या अंदाजपत्रकातील वाढ | ०.५००० | ८.८०७९ |
| | | | शास्त्रोक्त भराव भूमी (SLF) च्या कामातील वाढ | ०.६००० | |
| | | | **एकूण** | **१.१०००** | |